**आमदार स्थानिक विकास कार्यक्रम अंतर्गत कनिष्ठ न्यायालय, जिल्हास्तरीय न्यायालय व उच्च न्यायालयाच्या लायब्ररीसाठी निधी देणे या नवीन बाबीचा समावेश करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
शासन निर्णय क्रमांकः स्थाविका ०३१४/प्र.क्र.२३/का.१४८२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १२ ऑगष्ट, २०१४

संदर्भ :- शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक स्थाविका २०११/प्र.क्र.४७/का.१४८२,
दिनांक: १३ सप्टेंबर, २०११.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रामध्ये जिल्हा, तालुक्या ठिकाणी सुमारे ४५० न्यायालय काम करतात. त्या प्रत्येक ठिकाणी वकील संघ असून त्या वकील संघासाठी पुस्तके व संगणक याची लायब्ररी आवश्यक आहे. खासदार स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमाप्रमाणे आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत वकील संघाच्या लायब्ररीकरीता मदत देण्याची मागणी बार कौन्सिल ऑफ महाराष्ट्र ॲण्ड गोवा या असोशिएशनने शासनाकडे केली त्यानुसार आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत कनिष्ठ न्यायालय, जिल्हास्तरीय न्यायालय व उच्च न्यायालयाच्या लायब्ररीसाठी निधी देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यातील जिल्हा न्यायालय, जिल्हास्तरीय न्यायालय व उच्च न्यायालय यांच्या वकील संघासाठी असलेल्या पुस्तके व संगणक यांच्या लायब्रीकरिता आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत निधी देण्याबाबत पुढील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे -

१) कनिष्ठ व जिल्हास्तरीय न्यायालयाच्या बार कॉन्सिल लायब्ररीसाठी रुपये ५०,०००/- प्रति वर्षी ( एक किंवा एकापेक्षा अधिक आमदार महोदय मिळून )

२) उच्च न्यायालयाच्या बार कॉन्सिल लायब्ररीसाठी रुपये २ लाख प्रति वर्षी ( एक आमदार जास्तीत जास्त रुपये ५०,०००/- या कामासाठी प्रस्तावित करु शकतील)

३) ज्या कनिष्ठ, जिल्हास्तरीय, व उच्च न्यायालयाच्या बार कॉन्सिल लायब्ररीसाठी खासदार स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत निधी उपलब्ध करुन दिलेला आहे, त्या लायब्ररीसाठी आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत निधी उपलब्ध करुन देण्यात येऊ नये.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१२११३४२२०९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Belgudri

Digitally signed by Arunkumar S Belgudri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Belgudri
Date: 2014.08.12 15:25:52 +05'30'

( अ. शि.बेळगुद्री )
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा.उप मुख्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
५. मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
६. सर्व विभागीय आयुक्त,
७. सर्व जिल्हाधिकारी,
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
९. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,

११.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१३.सर्व उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांची कार्यालये,

१४.सर्व जिल्हा नियोजन अधिकारी,

१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१६.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

१७.वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२,

१८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

१९.ग्रंथपाल, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

२०.बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१,

२१.भारतीय जनता पाटी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-२०,

२२.भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई–४,

२३.महाराष्ट्र कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३,

२४.इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५,

२५.नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१ (५ प्रती),

२६.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८,

२७. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, मातोश्री हाईट, पद्माबाई ठक्कर मार्ग, रुपारेल कॉलेज जवळ, माटुंगा (प), मुंबई-२८,

२८. निवड नस्ती/का-१४८२, मंत्रालय, मुंबई.